सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) मार्फत खरेदी करण्यात आलेल्या व निर्लेखित केलेल्या शासकीय वाहन क्रमांक एमएच-०१-एसए-४०४० (Ford Fusion) च्या विक्रीबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. वाहन २०१५/ प्र.क्र.१५०/आस्था-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २५ फेब्रुवारी, २०२०

**संदर्भ** :- (१) नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई यांचे पत्र क्र.शापसे/वा.त./२०१९/१८१८, दि.६.७.२०१९
(२) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.वाहन(सपववि)२०१५/प्र.क्र.१५०/आस्था-२ दि.१६.७.२०१९
(३) वित्त विभाग परिपत्रक क्र.डीएफपी१०९१/प्र.क्र.४/विनियम दि.१८.६.१९९१.
(४) वित्त विभाग परिपत्रक क्र.विअप्र१०००/प्र.क्र.३१/२००१/विनियम दि.१५.६.२००१
(५) सामान्य प्रशासन विभाग, माहिती तंत्रज्ञान संचालनालय शासन निनर्णय क्र.मातंसं०८०/६/२०१३-DIR-DIT (MH)/३९ दि.३.१२.२०१४
(६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक डीएफपी१०१६/प्र.क्र.०७/१६/विनियम दिनांक २२.६.२०१६

**प्रस्तावना :-**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागामार्फत माहे जुलै २००७ मध्ये विहीत कार्यपध्दती अवलंबून रु.६,००,०००/- इतक्या किंमतीस खरेदी करण्यात आलेले शासकीय वाहन क्रमांक एमएच-०१-एसए-४०४० (**फोर्ड फ्युजन**) संदर्भीय अनुक्रमांक २ येथील दिनांक १६.७.२०१९ च्या शासन निर्णयान्वये निर्लेखित करण्यात आले. सदर वाहनाच्या विक्रीसाठी वित्त विभागाची दिनांक १८.६.१९९१, दिनांक १५.६.२००१ आणि दिनांक २२.६.२०१६ ची संदर्भीय परिपत्रके, सामान्य प्रशासन विभाग, माहिती तंत्रज्ञान संचालनालय यांचा संदर्भीय दिनांक ३.१२.२०१४ चा शासन निर्णय यातील मार्गदर्शक सूचनांच्या अधीन राहून वेळोवेळी वित्त विभागाच्या सल्ल्याने विहीत कार्यपध्दती अवलंबण्यात आलेली आहे.

२. निविदा सादर करावयाच्या कालावधीत विहीत पध्दतीने मोहोरबंद लिफाफ्यांमधून खालील ६ निविदा या विभागाकडे प्राप्त झाल्या आहेत :-

| | | | | |
|---|---|---|---|---|
| निविदा क्र.१ | - | श्री. खान मोहमंद अली अफजल, अहमदनगर | - | रु.२२,२२०/- |
| निविदा क्र.२ | - | श्री. इब्राहीम जे. मन्सुरी, मुंबई | - | रु.२३,०००/- |
| निविदा क्र.३ | - | श्री.अब्दुल लतीफ पटेल, मुंबई | - | रु.१५,०००/- |
| निविदा क्र.४ | - | श्री.तबरेज के. मंसुरी, मुंबई | - | रु.२३,२००/- |
| निविदा क्र.५ | - | श्री. नसीबउल्लाह ए. खान, मुंबई | - | रु.३२,८००/- |
| निविदा क्र.६ | - | श्री. शाहीद शौकत खान, मुंबई | - | रु.२५,७००/- |

यामध्ये श्री. नसीबउल्लाह ए. खान, मुंबई यांची निविदा अधिकतम किंमतीची आहे.

३. सदर वाहन जुलै २००७ मध्ये खरेदी केल्यास १२ वर्षे पूर्ण झालेली आहेत. वित्त विभागाच्या संदर्भीय शासन परिपत्रक दिनांक २२.६.२०१६ मधील परि. ३ मध्ये नमूद केल्यानुसार प्रशासकीय विभागास, विभागाच्या ताब्यातील निर्लेखित केलेल्या शासकीय वाहनाच्या विक्रीबाबतचे अधिकार देण्यात आले आहेत.

४. सदर वाहन हे सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) मार्फत विभागासाठीच खरेदी करण्यात आलेले असल्यामुळे आणि या प्रक्रियेमध्ये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) हाच प्रशासकीय विभाग असल्यामुळे **सदर वाहनाची विक्री या विभागामार्फत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाकडून आता खालीप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-**

**शासन निर्णय :-**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागामार्फत खरेदी करण्यात आलेले आणि संदर्भीय अनुक्रमांक २ येथील दिनांक १६.७.२०१९ च्या शासन निर्णयान्वये निर्लेखित करण्यात आलेल्या शासकीय वाहन क्रमांक एमएच -०१-एसए-४०४० (**फोर्ड फ्युजन) ची विक्री करण्यास खालीलप्रमाणे मंजूरी देण्यात येत आहे :-**

अ. वित्त विभागाची संदर्भीय अनुक्रमांक ३,४ आणि ६ येथील शासन परिपत्रकांमधील मार्गदर्शक सूचनांनुसार विहीत कार्यपध्दती अवलंबून वाहन विक्रीसाठी आलेली निविदेची किंमत हातच्या किंमतीपेक्षा कमी येत असल्यास निविदा स्विकारण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास देण्यात आलेले असल्यामुळे आणि या प्रक्रियेमध्ये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) हाच प्रशासकीय विभाग असल्यामुळे विभागाकडे प्राप्त झालेल्या ६ निविदांपैकी अधिकतम किंमतीची निविदा सादर केलेले श्री. नसीबउल्लाह ए. खान, मुंबई यांची रु.३२,८००/- इतक्या रकमेची निविदा स्विकारण्यास आणि त्यास अनुसरून शासकीय वाहन क्रमांक एमएच -०१-एसए-४०४० (**फोर्ड फ्युजन) या वाहनाची "वाहन जसे आहे त्या स्थितीत" रु.३२,८००/- (रुपये बत्तीस हजार आठशे फक्त) इतक्या किंमतीस विक्री करण्यास** याअन्वये मान्यता देण्यात येत आहे.

ब. निविदा सादर केलेले अन्य ५ निविदाकार, श्री. खान मोहमंद अली अफजल, अहमदनगर; श्री. इब्राहीम जे. मन्सुरी, मुंबई; श्री. अब्दुल लतिफ पटेल, मुंबई; श्री.तबरेज के. मन्सुरी, मुंबई; आणि श्री. शाहीद शौकत खान, मुंबई यांनी निविदेसाठी भरणा केलेली इसाऱ्याची प्रत्येकी रु.५००/- इतकी रक्कम त्यांना परत करण्यास याअन्वये मंजूरी देण्यात येत आहे.

क. श्री. नसीबउल्लाह ए. खान, मुंबई यांनी निविदा सादर करताना भरणा केलेली इसाऱ्याची रु.५००/- इतकी रक्कम निविदेच्या रु.३२,८००/- इतक्या रकमेमधून वजा करून उर्वरित रु.३२,३००/- (रुपये बत्तीस हजार तिनशे फक्त) रकमेचा भरणा विभागाच्या रोखशाखेमध्ये करण्यास निविदाकार श्री. नसीबउल्लाह ए. खान, मुंबई यांना मंजूरी देण्यात येत आहे. सदर रकमेचा भरणा रोखशाखेमार्फत शासन कोषागारात करण्यात यावा.

ङ त्यानंतर निविदाकार, श्री. नसीबउल्लाह ए. खान, मुंबई यांनी निविदा सूचनेमध्ये नमूद केलेल्या अटींपैकी क्र.८ नुसार प्रथमत: आवश्यक त्या कराचा भरणा करून त्याबाबतचा लेखी पुरावा या विभागाकडे सादर करावा.

इ. निविदाकार, श्री. नसीबउल्लाह ए. खान, मुंबई यांनी निविदा सूचनेतील अट क्र. ११ अनुसार सदर वाहनाबाबतच्या हस्तांतरण नोंदणीबाबत सर्व प्रक्रिया स्वखर्चाने पूर्ण करावी.

ई. सदरहू सर्व प्रक्रिया पूर्ण केल्यानंतर शासकीय नवीन प्रशासकीय इमारतीच्या आवारात ठेवण्यात आलेले वाहन जसे आहे त्या स्थितीत घेऊन जाण्यासाठी त्यांना मान्यतेचे प्राधिकारपत्र सुपूर्द करण्यास आणि त्यानंतर वाहन श्री. नसीबउल्लाह ए. खान, मुंबई यांचे ताब्यात देण्यास याअन्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक डीएफपी१०१६/प्र.क्र.०७/१६/विनियम दिनांक २२.६.२०१६ मधील परि. ३ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकरांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

३.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेवसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२००२२५१५४९३१९२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sudin Gaikwad

Digitally signed by Sudin Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing and Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=20315cd32e197cc2334676dbe1f09f90b2334eddf7e75d09609003b414273f73, serialNumber=8ff188a569f4a95d2f0ce8ca61e60d8aa5f51a1bf65b42dd49bb26d165941d9e, cn=Sudin Gaikwad
Date: 2020.02.25 15:52:10 +05'30'

**( डॉ. सुदिन गायकवाड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
२) महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

**प्रत उचित कार्यवाहीसाठी :-**

कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मुंबई

**प्रत :-**

१. प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक
२. सचिव(वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक
३. नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई ४०००३०,
४. वित्त विभाग, (व्यय-४)/विनियम, मंत्रालय, मुंबई ४०००३२,
५. सामान्य प्रशासन माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई
६. अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. श्री. नसीबउल्लाह ए. खान, शॉप नं.६, हाजी महमूद कम्पाऊंड, टॅक्सीमन कॉलनी, गेट क्र.२ समोर, कुर्ला-बांद्रा रोड, कुर्ला(पश्चिम), मुंबई ४०००७०
८. श्री. अब्दुल लतीफ पटेल, १४/४६ बारा-इमाम रोड, पहिला मजला, रुम नं.१६, मुंबई ४०० ००३
९. श्री. खान मोहमंद अली अफजल, प्लॉट नं.२, सी.आय.व्ही.हौ.सोसायटी, मुकुंदनगर, दर्गादायरा रोड, अहमदनगर
१०. श्री. इब्राहीम जे मन्सुरी, १५१, बारा-इमाम रोड, पहिला मजला, मुंबई ४०० ००३
११. श्री. तबरेज के. मन्सुरी, १५३/१५७, बारा-इमाम रोड, १०९/११७, दुसरा मजला, मुंबई ४००००३
१२. श्री. शाहिद शौकत खान, III/४२, REAY Chambers, D'LIMA Street, डॉकयार्ड रोड,मुंबई ४०००१०.